**कोल्हापूर जिल्हयांतील चिकोत्रा खो-यातील समन्यायी पाणी वाटपाच्या पथदर्शी प्रकल्पात मांगनूर व हसूर बुद्रुक या दोन गांवाऐवजी तमनाकवाडा या गावाचा समावेश करण्याबाबत.**

**महाराष्ट्रशासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१४/( ८४ /२०१४)/जसंनि**
मंत्रालय
मुंबई - ४०० ०३२.
तारीख:११.०९.२०१४

वाचा-

१) शासन निर्णय क्रमांकःचिकोत्रा - २०११/ प्र.क्र. २४८/ जसंनि दि. ०७/०७/२०१२
२) शासन निर्णय क्रमांकःचिकोत्रा - २०११/ प्र.क्र. २४८/ जसंनि दि. ११/०२/२०१४
३) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे पत्र जा.क्र. मकृ खोविम/(४०)/(७१८/२०१४)/प्रशा-३/६३८३ दि.२०/०८/२०१४ चे पत्र

प्रस्तावना-

शासनाने वरील संदर्भ क्र.१ च्या निर्णयानुसार कोल्हापूर जिल्हयातील चिकोत्रा नदी खोऱ्यातील एकूण ५२ गावांपैकी बेगवडे, बेलेवाडी (हुब्बळगी), बेलेवाडी (काळम्मा), हसूर बुद्रुक, मांगनूर व बामणे या ६ गावामध्ये समन्यायी पाणी वाटपाचा पथदर्शी प्रकल्प हाती घेण्यास मान्यता दिली आहे. सदर मान्यता प्राप्त ६ गावांपैकी मांगनूर आणि हसूर बुद्रुक या गावांनी सोयीच्या दृष्टीने चिकोत्रा मध्यम प्रकल्पाऐवजी दिंडेवाडी-बारवे (नागनवाडी) या ल.पा. प्रकल्पातील धरणाच्या पाण्यातून प्रकल्प राबविण्याचा निर्णय घेतला, परंतु सदर धरणाचे काम सद्य:स्थितीत भूसंपादनाच्या अडचणीमुळे बंद पडले आहे. त्यामुळे तेथील पथदर्शक प्रकल्पाचे काम चालू आर्थिक वर्षात सुरु होणार नाही. सदर बाबी विचारात घेवून चिकोत्रा खोरे सहकारी पाणलोट व्यवस्थापन संस्था संघ मर्यादित, कोल्हापूर, यांनी पथदर्शक प्रकल्पातील मांगनूर व हसुर बुद्रुक येथील सहकारी पाणलोट व्यवस्थापन व पाणी वापर संस्था यांच्याशी विचारविनिमय करुन या २ गावांऐवजी तमनाकवाडा या गावाचा समावेश उक्त पथदर्शी प्रकल्पात करण्याची मागणी केली आहे.

चिकोत्रा खो-यातील समन्यायी पाणी वाटपाच्या पथदर्शी प्रकल्पाच्या प्रशासकीय मान्यता प्राप्त मंजूर प्रकल्प अहवालात मांगनूर व हसुर बुद्रुक या दोन गावांच्या योजनांसाठी अनुक्रमे रु. ६.९८ कोटी व रु. ६.०६ कोटी (दरसूची २००९-१० नुसार) इतकी तरतूद समाविष्ट आहे. आता प्रस्तावित केलेल्या तमनाकवाडा या गावाच्या उपसा सिंचन योजनेची किंमत रु. १३.०५ कोटी (दरसूची २०१४-१५ नुसार) इतकी आहे. ही किंमत वरील दोन गावांच्या मंजूर किंमतीच्या मर्यादेत आहे. वरील दोन गावांऐवजी तमनाकवाडा हे गाव उक्त पथदर्शक प्रकल्पात ५ वे गाव म्हणून समाविष्ट करण्यास मान्यता देण्याबाबत महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाने संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये शासनास शिफारसपूर्वक विनंती केली आहे. या अनुषंगाने आवश्यक निर्णय घेण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय –**

चिकोत्रा नदी खो-यातील ५२ गावांपैकी (१) बेगवडे (२) बेलेवाडी (हुब्बळगी) (३) बेलेवाडी (काळम्मा) (४) हसूर बुद्रुक (५) मांगनूर (६) बामणे या ६ गावांच्या समन्यायी पाणी वाटपासाठीच्या प्रशासकीय मान्यता प्राप्त पथदर्शी प्रकल्पातील मांगनूर व हसूर बुद्रुक या दोन गावांऐवजी तमनाकवाडा या गावाचा संदर्भ क्र.१ येथील दि.०७ जुलै, २०१२ रोजीच्या मूळ शासन निर्णयातील अटींच्या अधीन राहून समावेश करण्यास दि.०३.०९.२०१४ रोजी झालेल्या मंत्रीमंडळाच्या बैठकीतील मान्यतेनुसार मंजुरी देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१११५०२३६४०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपालयांच्या आदेशानुसार व नावाने.

Pramod Govindrao Mandade

Digitally signed by Pramod Govindrao Mandade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pramod Govindrao Mandade
Date: 2014.09.11 14:58:13 +05'30'

**प्र.गो. मांदाडे**
उपसचिव , महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखावअनुज्ञेयता)/(लेखापरिक्षा), नागपूर
२. मा.मंत्री, जलसंपदाविभाग (मकृखोविपामंवगळून) यांचे खाजगी सचिव
३. मा.मंत्री, जलसंपदा विभाग, मकृखोविपामं यांचे खाजगी सचिव
४. सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.
५. प्रधानसचिव,(जसं) जलसंपदा विभाग ,मंत्रालय, मुंबई .
६. प्रधानसचिव ,(लाक्षेवि) जलसंपदा विभाग, मंत्रालय , मुंबई.
७. कार्यकारी संचालक,महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे .
८. मुख्य अभियंता, (विप्र) जलसंपदा विभाग , पुणे
९. मुख्य अभियंता (जसं) व सहसचिव, मंत्रालय , मुंबई.
१०. आंतर वित्त सल्लागार व सहसचिव, मंत्रालय, मुंबई.
१३. जसंनि कार्यासन संग्रहार्थ.